श्री.एस.डी. पानझडे,निवृत्त शहर अभियंता यांना सेवानिवृत्तीनंतर करार पध्दतीने दिलेल्या नेमणूकीस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- औमपा-२०२१/प्र.क्र.२१९/नवि-२४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १८ जानेवारी, २०२२

संदर्भ:- १) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.औमपा-२०२१/प्र.क्र.२१९/नवि-२४ दि.२.९.२०२१
२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपा/आस्था-१/२०२१/१६०७ दि. १७.१२.२०२१

**शासन निर्णय:-**

श्री. एस.डी. पानझडे, शहर अभियंता, औरंगाबाद महानगरपालिका हे नियत वयोमानानुसार दि. ३०.६.२०२१ रोजी सेवानिवृत्त झाले आहेत. औरंगाबाद महानगरपालिककडे तांत्रिक संवर्गातील अधिका-यांची पदे रिक्त असून शहर अभियंता या पदावर पदोन्नतीने नेमणूक करण्यासाठी महानगरपालिकेत कार्यकारी अभियंता या संवर्गात एकही अधिकारी उपलब्ध नाही. औरंगाबाद महानगरपालिका क्षेत्रातील विविध विकास कामे/महत्त्वाकांशी प्रकल्प पुर्ण करण्यसाठी अनुभवी अधिका-यांची उणीव भासू नये, या करिता श्री. एस. डी. पानझडे,निवृत्त शहर अभियंता यांना दि.१.७.२०२१ ते दि. ३१.१२.२०२१ या सहा महिन्याच्या कालावधीसाठी करार पध्दतीने नेमणूक देण्यास संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २.९.२०२१ अन्वये शासनाची मान्यता देण्यात आली होती.

२. औरंगाबाद महानगरपालिका क्षेत्रातील विविध विकास कामे / महत्त्वाकांशी प्रकल्प पूर्ण करण्यासाठी श्री. एस.डी. पानझडे, शहर अभियंता (सेवानिवृत्त), औरंगाबाद महानगरपालिका यांना दि.१.१.२०२२ ते दि.३०.६.२०२२ या कालावधीसाठी शासन मान्यतेच्या अधीन राहून नेमणूक देण्याबाबतचा ठराव क्र.२३८ दि.१३.१२.२०२१ महानगरपालिकेने संमत केलेला आहे.

३. औरंगाबाद महानगरपालिकेच्या उक्त ठरावानुसार तसेच महानगरपालिका आयुक्तांच्या संदर्भाधीन प्रस्तावानुसार श्री. एस.डी. पानझडे, शहर अभियंता (सेवानिवृत्त), औरंगाबाद महानगरपालिका यांना महानगरपालिकेतील कामांसाठी सेवानिवृत्ती नंतर करार पध्दतीने दिलेल्या नेमणूकीस दि.१.१.२०२२ ते दि.३०.६.२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०११८१८१२३३८३२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.01.18 18:13:43 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) आयुक्त तथा प्रशासक, औरंगाबाद महानगरपालिका, जि.औरंगाबाद.
३) मुख्य लेखा अधिकारी, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद.
४) नगर सचिव, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद.
५) एस. डी. पानझडे,निवृत्त शहर अभियंता,औरंगाबाद महानगरपालिका.
६) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (नवि-२४).